अलिबाग जिल्हा कारागृह कर्मचा-यांच्या निवासस्थानासाठी आरक्षण क्र. ३२ ची जागा संपादन करण्यास प्रशासकीय मान्यता देणे.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांक-एलएनडी-०१९७/१/प्र.क्र. ३३/पोआरएस-२.
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. दिनांक:- १५ मार्च १९९९.

पहा:- १) कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. बीएलडी/शानि/अजिर्का/१९९५/कक्ष-३, दिनांक २७. १. १९९७.

२) जिल्हाधिकारी यांची अधिसूचना क्र. मशा/भुसं/६/४.६११२/१९९४/दिनांक १. १०. १९९४.

३) आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई यांचे पत्र क्र. भूसं/का. १ अ/अनुदान आदेश क्र. १/४०७०/२५८२/९८ दिनांक २१. ३. ९८.

शासन निर्णय:- अलिबाग जिल्हा कारागृह कर्मचा-यांना निवासस्थाने बांधण्यासाठी आरक्षण क्र. ३२ मधील जागा संपादन करण्यास शासनाने प्रशासकीय मान्यता द्यावी अशी विनंती कारागृह महानिरीक्षक यांनी शासनास केली आहे. याच्या समर्थनार्थ कारागृह महानिरीक्षक यांनी असे नमूद केले आहे की, कारागृहातील कर्मचा-यांना जवळच निवासस्थाने उपलब्ध झाल्यास त्याचा कार्यालयीन कामकाजावर चांगला परिणाम होऊन कार्यालयीन कामकाज सुरळीत पार पाडण्यास चांगली मदत होईल. पर्यायाने कार्यालयाची कार्यक्षमता वाढेल. यास्तव निवासस्थानासाठी भूसंपादन करण्यास प्रशासकीय मान्यता तात्काळ मिळावी.

२. अलिबाग जिल्हा कारागृह कर्मचा-यांच्या निवासस्थानासाठी आरक्षण क्र. ३२ च्या जागा संपादन करणेबाबतचा कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी शासनास सादर केलेला प्रस्ताव कांही काळ शासनाच्या विचाराधीन होता. त्या अनुषंगाने विचाराअंती शासन कारागृह महानिरीक्षक यांनी शासनास सादर केलेल्या अलिबाग जिल्हा कारागृह कर्मचा-यासाठी निवासस्थाने बांधण्याकरीता आरक्षण क्र. ३२ मधील जागा संपादन करण्यास व त्याप्रीत्यर्थ येणारा खर्च रु. १०, ५६, ६१२/- इतक्या खर्चास या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देत आहे.

३. अलिबाग जिल्हा कारागृह कर्मचा-यासाठी निवासस्थाने बांधण्याकरिता आरक्षण क्र. ३२ मधील भूमि संपादन करण्याकरिता येणा-या खर्चाची तरतूद अर्थसंकल्पात झाल्याशिवाय या प्रकरणी प्रत्यक्ष कार्यवाही करण्यात येऊ नये. सदर प्रकरणी कोणत्याही परिस्थितीत अतिरिक्त अनुदान उपलब्ध करुन देण्यात येणार नाही, याची कृपया नोंद घ्यावी.

.. २.

४. अलिबाग जिल्हा कारागृह कर्मचा-यांसाठी निवासस्थाने बांधण्याकरीता आरक्षण क्र. ३२ मधील भूमि संपादनासाठी येणारा खर्च मागणी क्र. बी-१९ "मुख्य लेखाशीर्ष ४०७०-इतर प्रशासनिक सेवावरील भांडवली खर्च पंचवार्षिक योजनांतर्गत योजना [एकी] ८०० इतर खर्च ८०० [एक] तुरुंग खात्याच्या कर्मचारी निवासस्थानासाठी अलिबाग येथे भूमी संपादन करणे" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा व तो आर्थिक वर्ष १९९९-२००० या वर्षात उपलब्ध होणा-या मंजूर अनुदानातून भागविण्यांत यावा.

५. हा शासन निर्णय, नियोजन विभाग/१४५५, दिनांक १.१.९८ च्या अनौपचारिक संदर्भान्वये व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र. सीआर-२५९०, दिनांक १४.५.९८ अन्वये त्यांच्या संमतीने निर्गमित करण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

गु.ज.कुलकर्णी

[ गु. ज. कुलकर्णी ]
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.

कारागृह उपमहानिरीक्षक, [मुख्यालय], महाराष्ट्र राज्य, पुणे.

कारागृह उपमहानिरीक्षक, दक्षिण विभाग, मुंबई.

अधिक्षक, जिल्हा कारागृह, अलिबाग.

महालेखापाल, महाराष्ट्र-१ [लेखा व अनुज्ञेयता] मुंबई.

महालेखापाल, महाराष्ट्र-१ [लेखा परिक्षा] मुंबई.

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

जिल्हा कोषागार अधिकारी, अलिबाग.

आयुक्त, कोकण विभाग यांचे कार्यालय, कोकण भवन, पहिला मजला, नवी मुंबई.

नियोजन विभाग/का-१४५५, मंत्रालय, मुंबई.

वित्त विभाग/व्यय-८, मंत्रालय, मुंबई.

सार्वजनिक बांधकाम विभाग/अर्थ-२, मंत्रालय, मुंबई.

कार्यासन अधिकारी, गृह विभाग, बोपुडी-१.

निवडनस्ती, पोआरएस-२.